**कापूस खरेदी हंगाम २०१४-१५ कापसाची रक्कम शेतक-यांना अदा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघास दुराव्यापोटी कर्ज मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कापूस-१०१४/प्र.क्र.६८/१०-स**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ नोव्हेंबर, २०१४.

**प्रस्तावना :**

शासनाने नाफेड समवेत केलेल्या करारपत्रानुसार महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ हा नाफेडचा सब-एजंट म्हणून काम करणार आहे. हंगाम २०१४-१५ मध्ये कापूस खरेदी करतांना कापसाची रक्कम शेतक-यांना अदा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाला दुराव्यापोटी कर्ज मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार हंगाम २०१४-१५ मधील कापूस खरेदी योजनेंतर्गत कापूस उत्पादक पणन महासंघाने शेतक-यांकडून खरेदी केलेल्या / करावयाच्या कापसाची हमी किंमत अदा करण्यासाठी अर्थसंकल्पीत रुपये ५०.०० कोटी (रुपये पन्नास कोटी फक्त) एवढया रक्कमेतून रु. ३०.०० कोटी (रुपये तीस कोटी फक्त) एवढी रक्कम महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघास दुराव्यापोटी प्रचलित व्याज दराने कर्ज स्वरुपात उपलब्ध करुन देण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. सदर रक्कम ही विषयांकित कारणासाठीच खर्च करण्यात येईल याबाबत महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाने आवश्यक ती दक्षता घ्यावी.

३. या कारणासाठी होणारा खर्च सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, “मागणी क्रमांक व्ही-५, ६४२५, सहकारासाठी कर्जे, (००)(१०८)-इतर सहकारी संस्थांना कर्जे, (०१) पणन सहकारी संस्था (०१)(०३) कापूस प्रापण योजनेच्या कार्यान्वयनासाठी सीमांतिक रक्कम (६४२५००६४)(योजनेतर)-५५ कर्जे व आगाऊ रकमा” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०१४-१५ मध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. सदर कर्जाची रक्कम अधिदान व लेखाधिकारी, मुंबई येथून काढण्यासाठी व ती महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ, मुंबई या संस्थेस अदा करण्यासाठी श्रीमती अ.अ. चुरी, कक्ष अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी, तसेच श्री. रा.स. अटक, उप सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर रक्कम वित्त विभागाच्या दि. ०१.०७.२०१४ च्या शासन परिपत्रकानुसार ६०% अदा करण्यास वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. सदर रकमेचा धनादेश खाली नमूद केलेल्या यंत्रणेच्या नांवे काढण्यात यावा.

"THE MAHARASHTRA STATE CO-OPERATIVE COTTON GROWERS MARKETING FEDERATION LTD. "MUMBAI"

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्याकडील अनोपचारिक संदर्भ क्र.४८८/१४/व्यय-२, दि. २७.१०.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११११४१९२३३४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kadam S S

Digitally signed by Kadam S S
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Kadam S S
Date: 2014.11.11 14:27:21 +05'30'

(सुचिता सू. कदम)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मंत्री (कृषि व पणन) यांचे विशेष कार्य अधिकारी,
२. राज्यमंत्री (कृषि व पणन ) यांचे खाजगी सचिव,
३. मा. अपर मुख्य सचिव (पणन), कृषि व पणन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा, मुंबई-प्रथम/नागपूर-द्वितीय,
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ, मुंबई,
६. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. वित्त विभाग, (व्यय-२ / अर्थोपाय / अर्थसंकल्प-१२ ), मंत्रालय, मुंबई,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
१०.सहसचिव (रोख शाखा), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.अवर सचिव (कार्यासन १-स/ १७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२.कार्यासन अधिकारी (रोख शाखा / १६-स ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. निवडनस्ती (कार्यासन १०-स).